**रोजगार व स्वयंरोजगार विभागाचे कौशल्य विकास व उद्योजकता विभाग असे नामकरण करणे व त्या विभागासाठी प्रधान सचिवाचे स्वतंत्र पद निर्माण करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक एईओ-१०१५/प्र.क्र.०६/२०१५/दहा**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक १५ जानेवारी, २०१५**

**संदर्भ :-** (१) शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्रमांक शाकानि-१०९७/प्र.क्र.२९/९७/१८ (र.व.का.), दिनांक ११ जून, १९९७
(२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक संकीर्ण-१००७/५४६/१८ (र.व.का.), दिनांक ०८ सप्टेबर, २०१०

**प्रस्तावना :-**

रोजगाराबाबत बदलत्या आंतरराष्ट्रीय व राष्ट्रीय परिस्थितीत कौशल्य विकासावर अधिक भर देण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. या पार्श्वभूमीवर कौशल्य विकास व उद्योजकतेस अधिक प्रोत्साहन देण्याच्या उद्देशाने तसेच या कार्यक्रमाकडे अधिक प्रभावीपणे लक्ष पुरविले जावे या उद्देशाने कौशल्य विकास व उद्योजकता या स्वतंत्र मंत्रालयाची केंद्र शासनाने निर्मिती केली आहे. केंद्र शासनाच्या धर्तीवर राज्यामध्ये देखील स्वतंत्र कौशल्य विकास व उद्योजकता विभाग असावा व विविध विभागांकडील विषयांच्या अनुषंगाने अधिक कुशल मनुष्यबळ उपलब्ध होण्यासाठी परिणामकारक समन्वय साधता यावा यासाठी स्वतंत्र प्रधान सचिवाचे पद असावे याबाबत प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

राज्यात यापूर्वी रोजगार व स्वयंरोजगार असा स्वतंत्र मंत्रालयीन विभाग १९९७ मध्ये निर्माण करण्यात आला आहे. केद्रशासनाच्या धर्तीवर या विभागाचे नाव कौशल्य विकास व उद्योजकता विभाग असा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. त्याचप्रमाणे, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग असे नामकरण झालेल्या विभागासाठी प्रधान सचिव श्रेणीतील (वेतनश्रेणी रू. ६७०००-७९०००/-) एक पद नव्याने निर्माण करण्याचा व त्या पदावर पदावर भारतीय प्रशासन सेवेतील अधिका-यांची नियुक्ती करण्याचा देखिल शासनाने निर्णय घेतला आहे.

३. विभागाच्या नावातील बदलाच्या अनुषंगाने कार्यनियमावलीत उचित सुधारणा करण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १८ (र. व.का.) यांच्याकडून करण्यात यावी.

४. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग असे नामकरण झालेल्या विभागासाठी प्रधान सचिव श्रेणीतील निर्माण करण्यात आलेल्या पदाबाबतचा खर्च सध्याच्या रोजगार व स्वयंरोजगार विभागास म्हणजेच उपरोक्त निर्णयानुसार कौशल्य विकास व उद्योजकता विभाग असे नामकरण होणाऱ्या विभागास मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४०/१५/व्यय-४, दिनांक १५.०१.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१५०११५१५४४१५७९०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.01.15 17:54:22 +05'30'

**(डॉ. भगवान सहाय)**
अपर मुख्य सचिव (सेवा)
सामान्य प्रशासन विभाग

**प्रत:**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र २ नागपूर
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
४. मा. राज्यपाल यांचे सचिव
५. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
६. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
७. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (पत्राने)
८. विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती)
९. वित्त विभाग (व्यय-६) मंत्रालय, मुंबई
१०. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग (सध्याचा रोजगार व स्वयंरोजगार विभाग)(आस्थापना/रोख)
११. सर्व मंत्रालयीन विभाग
१२. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
१३. सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-१८ (र.व.का)
१४. सामान्य प्रशासन विभाग कार्यासन ९/ ९-अ/ १०-अ
१५. निवड नस्ती (कार्यासन-दहा)

*****